<u>सर्वसाधारण बदल्या (सन २०२०)</u>
**प्रादेशिक परिवहन अधिकारी**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन आदेश क्रमांकः एमव्हिडी ०७२०/प्र.क्र.१३२ (१)/परि-४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक: १० ऑगस्ट, २०२०

<u>शासन आदेश-</u>

सार्वजनिक सेवेच्या हितार्थ महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनीयमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम २००५ मधील कलम ५(२) मधील तरतूदीनुसार आणि सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णय क्र.एसआरव्ही २०२०/प्र. क्र. ३०/कार्या.१२, दि.७.७.२०२० आणि दि.२३.७.२०२० नुसार, बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने खालील तक्त्यात नमूद प्रादेशिक परिवहन अधिकारी संवर्गातील अधिकाऱ्यांची प्रशासकीय कारणास्तव बदलीने त्यांच्या नावासमोर स्तंभ क्रमांक-४ मध्ये दर्शविलेल्या पदावर पदस्थापना करण्यात येत आहे.

| **अ.क्र.** | **अधिका-याचे नाव** | **सध्याची पदस्थापना** | **बदलीनंतरची पदस्थापना** |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | श्री. लक्ष्मण आनंदराव दराडे | पनवेल | परिवहन आयुक्त कार्यालय, मुंबई |

२. सदर अधिका-यांनी त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरित स्विकारावा. त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक-सीडीआर १०८२/२५६७/२८/अकरा, दि. ३० ऑगस्ट १९९२ च्या परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. त्यात दिलेल्या सूचना लक्षात घेऊन बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास, ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची संबंधीतांनी नोंद घ्यावी.

३. संबंधीत नियंत्रक अधिका-यांनी सदर बदली करण्यात आलेल्या अधिका-यांस त्यांच्या सध्याच्या पदभारातून कार्यमुक्त करुन त्यांना नवीन नेमणूकीच्या जागी तातडीने रुजू होण्यास सांगावे. याची संपूर्ण जबाबदारी संबंधीत नियंत्रक अधिका-यांची असेल.

४. संबंधीत अधिका-यांनी नवीन पदस्थापनेच्या ठिकाणी विहित कालावधीत रुजू व्हावे व पदभार स्विकारल्याचा अहवाल परिवहन आयुक्त कार्यालयामार्फत शासनास सादर करावा.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००८०६१३१६३७४०२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KADAM DATTATRAY HANMANT

Digitally signed by KADAM DATTATRAY HANMANT
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=cf316337e92d3c54da432222208093bfc6ed1d1570f094663515273d0b4d27fc, postalCode=400032, street=HOME DEP.MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=a923979cf886d5724fbed87cd57745c3f72eba57b0d277f11e970f0aaca99802, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=KADAM DATTATRAY HANMANT
Date: 2020.08.11 16:49:20 +05'30'

(द. ह. कदम)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुबई.
२. मा. मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मंत्री / राज्यमंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
८. जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व जिल्हे).
९. प्रादेशिक परिवहन अधिकारी (सर्व)
१०. उप प्रादेशिक परिवहन अधिकारी (सर्व)
११.संबंधित उप प्रादेशिक परिवहन अधिकारी.
१२.निवडनस्ती (परि ४).